मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातील
<u>अधिकाऱ्यांची बदली करणेबाबत</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि-११२४/प्र.क्र.११/प्रशा-२(१४ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १५ मार्च, २०२४

**<u>शासन आदेश</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव आंतरविभागीय बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | श्री / श्रीमती | कक्ष अधिकाऱ्याचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | श्री. | घनश्याम ना. पाऊसकर | सार्वजनिक बांधकाम विभाग | उद्योग, उर्जा व कामगार विभाग |
| २) | श्री. | संतोष शि. निळे | महिला व बाल विकास विभाग | इतर मागास बहुजन कल्याण विभाग |
| ३) | श्रीमती | ज्योत्स्ना अर्जुन | कृषि व पदुम विभाग | ग्राम विकास विभाग |

**२.** उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना **दिनांक १५.०३.२०२४ (म.नं.)** पासून रकाना क्र.४ येथील नमूद विभागातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

**३.** सदर आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागांनी नव्याने आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

**४.** बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणल्यास संबंधितांची कृती गैरवर्तणूक समजण्यात येईल.

**५.** सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४५/१८ (र.व का.), दिनांक २५.०८.२०२२ मध्ये नमूद केल्यानुसार, संबंधित अधिकाऱ्यांनी कार्यमुक्त होताना कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे.

**६.** संबंधित विभागाने सदर कक्ष अधिकारी विभागात रुजू झाल्याबाबतची माहिती सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-प्रशा-२ (१४ब) यांना सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२२४९१४४९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK RAMAKANT JADHAV

Digitally signed by VIVEK RAMAKANT JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0c6f092192cae76ac289eef2587c5f28373c6e445e4552e27b340b424d48717c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F960CA130E1B6E0A979CBB41C7516CA46961184AD1E4ECE1A118390C02E6745E, cn=VIVEK RAMAKANT JADHAV
Date: 2024.03.15 22:58:19 +05'30'

**( वि. र. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) श्री. घनश्याम ना. पाऊसकर, कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) श्री. संतोष शि. निळे, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) श्रीमती ज्योत्स्ना अर्जुन, कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

**....(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, महिला व बाल विकास विभाग, कृषि व पदुम विभाग, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, ग्राम विकास विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
३) सह/उप सचिव (आस्थापना), सार्वजनिक बांधकाम विभाग, महिला व बाल विकास विभाग, कृषि व पदुम विभाग, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, ग्राम विकास विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बॅलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास रोड, मुंबई-४००००१
५) आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत),
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवड नस्ती/प्रशा-२(१४ब)